वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत विविध महाविद्यालयांमध्ये डिजिटल होर्डिंग व डिजिटल स्टँडी ही उपकरणे बसविण्यास प्रशासकीय मान्यता देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: मकृवि-१२२४/प्र.क्र.६५/७-अे**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक
मंत्रालय विस्तार,मुंबई ४०० ०३२
दिनांक : १४/०३/२०२४

**वाचा:-**

१) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२१/प्र.क्र.१२६/का-३४, दि.१३.०८.२०२१.
२) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.मावज-२०२३/प्र.क्र.१८७/का-३४, दि.२३.११.२०२३.
३) कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.३८/३अे,दि.२०.१०.२०२३.
४) संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांचे पत्र जा.क्र.मकृप/वि.शि.२/८७२/२०२४, दि.०७.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

राज्य शासनाच्या विविध विभागांमार्फत लोककल्याणकारी योजना, विकास प्रकल्प, अभिनव उपक्रम, अभियान आणि कार्यक्रम राबविले जातात. या योजना, अभिनव उपक्रम,अभियान आणि कार्यक्रम यांची माहिती जनसामान्यांपर्यत पोहचविण्याचे काम माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत केले जाते. यासाठी माहिती व जनसंपर्क महासंचालनालयामार्फत प्रसार माध्यमांच्या विविध प्रकारांचा वापर केला जातो. राज्य शासनाच्या विविध योजना, उपक्रम आणि अभियान यांवर आधारीत जाहिरातींच्या कल्पक कामांच्या निर्मितीसाठी (Creative Work), जाहिरातींची कार्ये पार पाडण्यासाठी तसेच, शासकीय जाहिरात वितरण धोरणाची अंमलबजावणीची कार्यपध्दती यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१३.०८.२०२१ व दि.२३.११.२०२३ च्या शासन निर्णयान्वये सूचना निर्गमित केल्या आहेत.

राज्यातील चारही कृषि विद्यापीठांमध्ये शेती, शेतीविषयक तंत्रज्ञान, शेतीपूरक व्यवसाय, खते, विविध बियाण्यांवर विविध संशोधनात्मक कार्य केले जाते. विद्यापीठांनी विकसीत केलेले शास्त्रोक्त तंत्रज्ञान/अभिनव उपक्रम/शेती पध्दती यांचा उपयोग शेतकऱ्यांना होण्याच्या दृष्टीने विस्तार कार्य हाती घेणे आवश्यक आहे. तसेच, विद्यापीठांतर्गत होणाऱ्या संशोधनात्मक कार्याची त्याचप्रमाणे,विद्यापीठांमार्फत राबविल्या जाणाऱ्या योजनांची व्यापक प्रसिध्दी व सदर योजना परिणामकारकरित्या शेतकऱ्यांपर्यंत पोहोचविणे गरजेचे आहे. याकरिता विद्यापीठ परिसरात डिजिटल होर्डिंग व डिजिटल स्टँडी बसविल्यास विद्यापीठाच्या संशोधनात्मक कार्याची व

विद्यापीठाने विकसीत केलेले शास्त्रोक्त तंत्रज्ञान/अभिनव उपक्रम/ शेती पध्दती याची व्यापक प्रसिध्दी होण्यास मदत होईल. डिजिटल होर्डिंग व डिजिटल स्टँडी या डिजिटल उपकरणांच्या माध्यमातून विद्यापीठाच्या विविध योजना किंवा कार्याबद्दल माहिती काही वेळातच शेतकरी व विद्यार्थ्यांपर्यंत पोहोचू शकते. त्यामुळे अशा डिजिटल उपकरणांची विद्यापीठांच्या विविध महाविद्यालयांतर्गत आवश्यकता असल्याने, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत, विविध महाविद्यालयांमध्ये डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी बसविणेबाबतचा एकूण रु.४५५.०० लाख रकमेचा प्रस्ताव उपरोक्त संदर्भ क्र.४ अन्वये, संचालक (विस्तार शिक्षण व सासावि), महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे यांनी शासनास सादर केला आहे. त्यासअनुसरुन वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत विविध महाविद्यालयांमध्ये,डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी बसविणेबाबतच्या एकूण रु.४५५.०० लाख इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकीय प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

**१.** वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी अंतर्गत विविध महाविद्यालयांमध्ये डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी बसविणेबाबतच्या एकूण रु.४५५.०० लाख (एकूण रुपये चार कोटी, पंचावन्न लाख फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकीय प्रस्तावास खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| Sr. No | Item Name | Size | Qty | Per Unit Cost | Total Amount |
|---|---|---|---|---|---|
| **(A)** | **Digital Hordings** | | | | |
| 1. | P6 OUTDOOR LED SCREEN (Pixel Pitch: P6 Outdoor, Resolution 32x 32 Module Size: 192 x 192 Brightness: 4500 cd/m2 IP Grade: IP65, Refresh Rate: >1920, Lamp Defective Rate: <0.0003, LED Encapsulation: SMD2525, Scan 1/8, Life: 100000 hours, Cabinet Material: MS Pixel Density: 27777) | 12.60 (L) x 8.18 (H) | 20 | 12,00,000 | 2,40,00,000 |
| 2. | CONTROLLER | | | | |
| 3. | 11Ft Unipole Structure | | | | |
| 4. | Installation | - | - | - | 5,00,000 |
| 5. | Transportation | - | - | - | 5,00,000 |
| | **Total (A)** | | | | **2,50,00,000** |
| **(B)** | **Digital Standee** | | | | |
| 1. | P4 Full color Outdoor LED Video wall with Novastar Processor TB4/Huidu C36C Including Fabrication and civil work And Transportation at Various Sites of Parbhani. | - | 50 | 4,00,000 | 2,00,00,000 |
| 2. | Installation | - | - | - | 5,00,000 |
| | **Total (B)** | | | | **2,05,00,000** |
| | **Total Amount=(A+B)** | | | | **4,55,00,000** |

२. वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, यांनी डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी या उपकरणांची खरेदी विहित पद्धतीने ई-निविदा प्रक्रिया राबवून करावी.

३. डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी यावर जाहिरात/प्रचार प्रसिद्धी करण्यात येणारा मजकूर हा कृषि विषयक योजना, तंत्रज्ञान, कार्यक्रम याबाबतचा व कृषि विद्यापीठाच्या धोरणांशी सुसंगत असावा.

४. सदर प्रसिद्धीतून शासनाने/कृषि विद्यापीठाने वेळोवेळी घेतलेल्या निर्णयांचे प्रतिबिंब दिसले पाहिजे.

५. डिजीटल होर्डिंग व डिजीटल स्टँडी यावर जाहिरात निर्मिती ( Creative Agency) निवड करण्याची पद्धती ही सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय दि.१३.०८.२०२१ व दि.२३.११.२०२३ मधील व कृषि व पदुम विभाग, शासन निर्णय, दि.२०.१०.२०२३ यातील तरतूदींनुसार करण्यात यावी.

६. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.डी-३, कृषि विषयक संशोधन व शिक्षण, ०१ पीकसंवर्धन, (००)(०९) वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठाला सहायक अनुदान (कार्यक्रम) (२४१५ ०१०५) या लेखाशिर्षाखालील ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) या उद्दीष्टाकरीता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२४०३१४१६१३००६५०१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRATIBHA MADHAV PATIL

Digitally signed by PRATIBHA MADHAV PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=b693d975fffc642fe6b87c2ce9e1297fd1e8bda9b459f85f75f159984ba680fd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=DA026E85AE8CBB4E3C2ACDBECBBF2F6D6CB0AE6ED5C1E54483490119EE0456AD, cn=PRATIBHA MADHAV PATIL
Date: 2024.03.14 16:22:44 +05'30'

**( प्रतिभा पाटील )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि), कृषि व पदुम विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. महासंचालक,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद,पुणे.
३. कुलगुरु, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी .
४. कुलसचिव, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी .
५. वित्तीय सल्लागार,महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे.
६. विद्यापीठ अभियंता, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ,परभणी .
७. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर.
८. महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी/ छत्रपती संभाजीनगर.
१०.उपकोषागार अधिकारी, परभणी/ छत्रपती संभाजीनगर.
११.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.

१२.उप मुख्य लेखा परीक्षक (वरिष्ठ) स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
१३.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४.निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१५.कार्यासन ७-अे (निवडनस्ती).